**गोकुळ प्रकल्प प्रतिष्ठाण, पन्हाळे ता. लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या मान्यता रद्द केलेल्या कुवे ता. लांजा जि. रत्नागिरी येथील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा हॅरिटेज कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटी, लांजा जि. रत्नागिरी या संस्थेकडे हस्तांतरीत करून जावडे ता.लांजा जि. रत्नागिरी या ठिकाणी स्थलांतरीत करुन चालविण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्र.याचिका-२०१८/प्र.क्र.८८/मावक**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२

दिनांक: ८ ऑगस्ट, २०१८.

वाचा:-

१) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे आदेश क्र.विजाभजसं/प्रा.आशा/कुवे/मान्यतारद्द/२०१४-१५/५५५/पुणे, दि.१३.०३.२०१५.

२) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे आदेश क्र.विजाभजसं/मा.आशा/कुवे/मान्यतारद्द/२०१४-१५/५५६/पुणे, दि.१३.०३.२०१५.

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.विभशा-२०१२/प्र.क्र.२२१/विजाभज-२, दि.१९.१२.२०१६.

४) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, शासन निर्णय क्र.विभशा-२०१२/प्र.क्र.२२१/विजाभज-२, दि.२४.०४.२०१८.

**प्रस्तावना:-**

हॅरिटेज कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटी, लांजा जि. रत्नागिरी या संस्थेने गोकूळ प्रकल्प प्रतिष्ठाण, पन्हाळे ता. लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या मान्यता रद्द केलेल्या कुवे ता. लांजा जि. रत्नागिरी येथील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा त्यांच्या संस्थेकडे हस्तांतरीत करून **जावडे ता. लांजा जि. रत्नागिरी** या ठिकाणी स्थलांतरीत करुन चालविण्यास परवानगी देण्याबाबत मा. उच्च न्यायालय मुंबई येथे याचिका क्र.८४५२/२०१६ दाखल केली होती. त्यामध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.१७.०३.२०१३ रोजी सदरहू संस्थेने दोन आठवडयात सक्षम प्राधिकारी यांच्याकडे निवेदन सादर करण्याचे निर्देष दिले होते. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार सदरहू संस्थेने दि.२९.०३.२०१७ रोजी तत्कालीन सचिव, सामाजिक न्याय विभाग यांच्याकडे दाखल केलेल्या निवेदनावर मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निकालानुसार आवश्यकती कार्यवाही करणे क्रमप्राप्त होते. त्यामुळे सदरहू न्यायालयीन प्रकरणात मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विधाराधीन होती.

## शासन निर्णय:-

मा.मुंबई उच्च न्यायालयाने याचिका क्रमांक ८४५२/२०१६ मध्ये दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने हॅरिटेज कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटी, लांजा जि. रत्नागिरी या संस्थेने गोकूळ प्रकल्प प्रतिष्ठाण, पन्हाळे ता. लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या मान्यता रद्द केलेल्या कुवे ता. लांजा जि. रत्नागिरी येथील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा त्यांच्या संस्थेकडे हस्तांतरीत करून **जावडे ता. लांजा जि. रत्नागिरी** या ठिकाणी स्थलांतरीत करुन चालविण्यास परवानगी देण्याबाबत त्यांच्या दि.७.५.२०१८ च्या पत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करण्याबाबतचे निवेदन सादर केले होते.

२. सदरहू संस्थेने सादर केलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने शासन निर्णय दि.१९.१२.२०१६ व दि.२४.०४.२०१८ मधील तरतूदी विचारात घेऊन हॅरिटेज कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटी, लांजा जि. रत्नागिरी या संस्थेने गोकूळ प्रकल्प प्रतिष्ठाण, पन्हाळे ता. लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या मान्यता रद्द केलेल्या कुवे ता. लांजा जि. रत्नागिरी येथील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा त्यांच्या संस्थेकडे हस्तांतरीत करून **जावडे ता. लांजा जि. रत्नागिरी** या ठिकाणी स्थलांतरीत करुन चालविण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची परवानगी देण्यात येत आहे:-

१) गोकूळ प्रकल्प प्रतिष्ठाण, पन्हाळे ता. लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या मान्यता रद्द केलेल्या कुवे ता. लांजा जि. रत्नागिरी येथील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांची मान्यता रद्द करताना सदरहू आश्रमशाळेमध्ये कार्यरत असलेल्या मान्यता प्राप्त सर्व शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना हॅरिटेज कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटी, लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या **जावडे ता. लांजा जि. रत्नागिरी** या ठिकाणी स्थलांतरीत करण्यात आलेल्या आश्रमशाळेत सामावून घेणे बंधनकारक असेल.

२) गोकूळ प्रकल्प प्रतिष्ठाण, पन्हाळे ता. लांजा जि. रत्नागिरी या संस्थेच्या मान्यता रद्द केलेल्या कुवे ता. लांजा जि. रत्नागिरी येथील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांची मान्यता रद्द करताना सदरहू आश्रमशाळेमध्ये कार्यरत असलेल्या सर्व शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नवीन संस्थेच्या आश्रमशाळेतील स्थलांतरीत ठिकाणी हजर होणे बंधनकारक राहील. अन्य ठिकाणी समायोजन करण्याबाबतची त्यांची कोणतीही विनंती विचारात घेतली जाणार नाही. समायोजनाचे आदेश दिल्यानंतर ३० दिवसात जे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी सदरहू संस्थेच्या स्थलांतरीत आश्रमशाळेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत. त्यांचे नाव समायोजनाच्या यादीतून काढून टाकण्याची कार्यवाही करण्यात येईल. त्यानंतर त्यांना समायोजनाचा किंवा पुन्हा सेवेत सामावून घेण्याचा हक्क सांगता येणार नाही.

३) सदरहू नवीन हस्तांतरीत व स्थलांतरीत झालेल्या आश्रमशाळेस स्थलांतरीत ठिकाणी विद्यार्थी संख्येबाबत कोणतीही सूट दिली जाणार नाही.

४) स्थलांतरीत ठिकाणी सदरहू संस्थेस आश्रमशाळेसाठी किमान ३ एकर जागा व त्यावर पुढील २ वर्षात स्वत:ची पक्की आणि संरक्षित भिंत असलेली इमारत बांधणे बंधनकारक असेल. विहीत कालावधीत इमारत बांधली नाही तर, सदरहू संस्थेच्या आश्रमशाळेस वेतनेतर अनुदान (परिपोषण अनुदान वगळून) मंजूर केले जाणार नाही. तसेच सदरहू संस्थेच्या आश्रमशाळांची मान्यता रद्द करण्याची कारवाई करण्यात येईल.

५) सदरहू संस्थेस स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेसाठी आवश्यकत्या सर्व भौतिक सोईसुविधा उपलब्ध करुन देणे बंधंनकारक असेल.

६) सदरहू संस्थेस बँक खात्यात पाच वर्षासाठी ठेवण्यात आलेली रक्कम रु. १०.०० लाख सदरहू कालावधी पूर्ण झाल्याशिवाय काढता येणार नाही किंवा सदरहू रक्कम कायमस्वरुपी बँक खात्यात ठेवण बंधंनकारक राहिल.

७) सदरहू संस्थेस आश्रमशाळेतील निवासी व अनिवासी विद्यार्थ्यांची काळजी घेणे बंधंनकारक असेल. तसेच निवासी विद्यार्थी व विद्यार्थीनीची विशेषत: काळजी घ्यावी लागेल. सदरहू निवासी विद्यार्थ्यांवर कोणत्याही प्रकारचा अन्याय व अत्याचार होणार नाही. याची काळजी घेणे बंधंनकारक असेल.

८) सदरहू संस्थेस त्यांच्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेचे या ठिकाणाहून अन्य ठिकाणी स्थलांतर करता येणार नाही. स्थलांतर करावयाचे झाल्यास त्यासाठी शासनाची मान्यता घेणे बंधंनकारक असेल. जर शासनाच्या मान्यतेशिवाय आश्रमशाळेचे हस्तांतर अथवा स्थलांतर केल्यास आश्रमशाळेची मान्यता आपोआप रद्द झाल्याचे समजण्यात यावे.

९) सदरहू संस्थेस व आश्रमशाळांना शासनाच्या अधिनियमाचे, नियमांचे, शासन निर्णयांचे अथवा आदेशांचे पालन करणे बंधनकारक असेल.

१०) सदरहू संस्थेच्या आश्रमशाळेत संस्थेच्या अथवा आश्रमशाळेच्या कर्मचाऱ्यांच्या निष्काळजीपणामुळे कोणत्याही प्रकारच्या गंभीर घटना घडणार नाहीत. याची काळजी घ्यावी लागेल. (उदा. विद्यार्थ्यांचा मृत्यू, विषबाधा, बलात्कार, लैगिंक अत्याचार, संर्पदंश, अपघात इत्यादी.)

११) सदरहू संस्थेच्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेतील निवासी विद्यार्थी संख्या ५० % पेक्षा कमी झाल्यास त्याची मान्यता रद्द करण्याची कारवाई करण्यात येईल.

१२) आश्रमशाळेसाठी पुरेशी मोकळी जागा व क्रिडागंण उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

१३) सदरहू संस्थेस हे आदेश निर्गमित झाल्यापासून ३० दिवसात स्थलांतरीत ठिकाणी सदरहू आश्रमशाळ सुरु करणे बंधनकारक असेल.

१४) मान्यता रद्द केलेल्या पुर्वीच्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेत जेवढे शैक्षणिक वर्ग सुरु होते तेवढेच वर्ग स्थलांतरीत ठिकाणी सुरु करणे बंधनकारक असेल. कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त वर्ग / तुकडी सुरु करता येणार नाही. त्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेणे बंधनकारक असेल.

१५) संस्थेने स्वत:च्या अधिकारात अतिरिक्त वर्ग / तुकड्या सुरु केल्यास सदरहू संस्थेच्या आश्रमशाळा हस्तांतर व स्थलांतरणाचे आदेश रद्द झालेले समण्यात येईल.

१६) संस्थेस कोणत्याही शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यास शासनाच्या, संचालनालयाच्या अथवा सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्व मान्यतेशिवाय नियुक्ती देता येणार नाही. नवीन पद भरती करताना शासनाच्या सर्व नियमांचे, आरक्षण विषयक धोरणाचे पालन केल्याशिवाय आणि सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेशिवाय कोणतेही नवीन पद भरत येणार नाही. अशा प्रकारची कोणतीही भरती केल्यास अथवा शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना पूर्व परवानगीशिवाय नियुक्ती दिल्यास अशा कर्मचाऱ्याच्या वेतनाचा सर्व खर्च सदरहू संस्थेस स्वत:च्या उत्पनातून करावा लागेल. अशा नियमबाह्य रित्या पद भरती केलेल्या अथवा नियुक्ती दिलेल्या कोणत्याही कर्मचाऱ्याच्या वेतनाची जबाबदारी शासनाची असणार नाही. ती सर्व जबाबदारी सदरहू संस्थेची असेल. तसेच राज्यातील अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे समायोजन झाल्याशिवाय सदर संस्थेच्या आश्रमशाळेस नविन पद भरण्यास कोणत्याही कारणास्तव मान्यता दिली जाणार नाही.

१७) संस्थेस नवीन कर्मचारी भरती करताना संच मान्यतेनुसार पदे मंजूर झाल्यानंतर प्रथमत: जाहिरात प्रसिध्द करण्यासाठी सक्षम प्राधिकाऱ्याची पूर्व परवानगी घेणे बंधनकारक असेल. त्यानंतर प्रसिध्द केलेली जाहिरात त्यांच्या निर्दशनास आणून उमेदवारांची लेखी परिक्षा घेऊन मुलाखतीद्वारे निवड करणे बंधनकारक असेल.

१८) सदरहू आश्रमशाळेत ज्या कर्मचाऱ्यांची समायोजनाने नियुक्ती करण्यात येईल अशा कर्मचाऱ्यांना सदरहू आश्रमशाळेत ३० दिवसात रुजू व्हावे लागेल. जे कर्मचारी उचित कारणाशिवाय रुजू होणार नाहीत अशा कर्मचाऱ्यांना तीनसंधी देण्यात याव्यात. त्यानंतरही ते नियुक्तीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास त्यांना सेवेची आवश्यकता नाही असे समजून त्यांच्या सेवा समाप्तीची कार्यवाही सक्षम प्राधिकारी यांचेकडून करण्यात यावी.

१९) हस्तांतरणास व स्थलांतरणास परवानगी दिलेल्या सदरहू संस्थेच्या आश्रमशाळा स्वनिधीतून उत्तमरित्या चालविणे ही जबाबदारी प्रामुख्याने संबधित संस्थेची असेल. सदरहू संस्थेस देय बाबीवरील अनुज्ञेय खर्चाची प्रतिपूर्ती वेळोवेळी शासनाचे ध्येय धोरण व अनुदानाच्या उपलब्धतेनुसार करण्यात येईल. शासनाचे अनुदान उपलब्ध होईपर्यंत आश्रमशाळांचा सर्व खर्च संस्थेच्या स्वनिधीतून करण्यात येईल अशा आशयाचे रु.१००

एवढया रक्कमेचे बंधपत्र नोटरी करुन घेण्यात यावे. तद्नंतरच सदरहू संस्थेस वेतन व वेतनेतर अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी. संस्थेने अशा प्रकारचे बंधपत्र न दिल्यास संस्थेच्या आश्रमशाळेस कोणत्याही प्रकारचे अनुदान वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येऊ नये.

२०) सदरहू संस्थेने या संदर्भात मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या सर्व याचिका व अवमान याचिका काढून घेणे बंधनकारक असेल. त्यानंतरच सदरहू संस्थेच्या आश्रमशाळेस मान्यता देण्याची कार्यवाही करावी.

२१) सदरहू संस्थेच्या प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळेस स्थलांतरीत ठिकाणी शाळा सुरु करण्यास परवानगी दिल्यानंतर सदरहू संस्था स्थलांतरीत ठिकाणी ज्यावेळी प्रत्यक्षात आश्रमशाळा सुरु करील त्यावेळी संच मान्यतेनुसार सदरहू आश्रमशाळेच्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना विद्यार्थी संख्यप्रमाणे वेतन आणि संस्थेस वेतनेत्तर अनुदान मंजूर करण्याचा व सदरहू आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची नावे सेवार्थ प्रणालीमध्ये समाविष्ट करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

२२) सदरहू संस्थेस शासनाच्या दि. २४.०४.२०१८ च्या शासन निर्णयातील अटि व शर्तीचे पालन करणे बंधंनकारक असेल.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र २०१८०८१३१४४२५२८७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2ac85a22a7c244beaad68d7bf50398b67204dc905155ddd4219e64a8ba0c058, cn=S. A. Pedgaonkar
Date: 2018.08.13 14:47:42 +05'30'

**(सु. अ. पेडगावकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव
५. सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
६. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखाकार, लेखा व अनुज्ञेयता / वित्त व लेखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण कोकण विभाग, प्रशासकीय इमारत, कोकण भवन, सी.बी.डी.बेलापूर , नवी मुंबई.
९. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, रत्नागिरी
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
११. अध्यक्ष / सचिव, **हॅरिटेज कल्चर आर्ट ॲण्ड एज्युकेशन डेव्हलपमेंट सोसायटी, लांजा जि. रत्नागिरी**
१२. निवडनस्ती - मावक.